**वितरण आदेश क्रमांक: ३**
**कोषागारातून रोख रक्कम देय अनुदान**
**२०१०-२०११.**

**पंचायत राज संस्थांना केंद्र पुरस्कृत १३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल बेसिक ग्रँटच्या सन २०१०-११ च्या दुस-या हप्त्याच्या प्राप्त अनुदानाचे वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- तेविआ-२०११/प्र.क्र. २९/ वित्त-४.**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : २५ मार्च,२०११.**

वाचा:- १) **शासन निर्णय क्रमांक: तेविआ-२०१०/प्र.क्र. २२ / वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ३० ऑगस्ट,२०१०.**
**२) शासन पत्र क्र.तेविआ २०१०/प्र.क्र.४३/वित्त-४, दिनांक ७ फेब्रुवारी,२०११.**

**प्रस्तावना** :- पंचायत राज संस्थांना त्यांचे बळकटीकरणासाठी, १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरुपात केंद्र शासनाकडून २०१०-११ च्या दुस-या हप्त्यापोटी रु.२४९.८० कोटी इतका निधी राज्यास प्राप्त झाला असून तो निधी सर्व पंचायत राज संस्थांना २०१०-११ या आर्थिक वर्षात वितरीत करावयाचा आहे. त्यानुसार शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** या शासन निर्णयान्वये १३ व्या वित्त आयोगाचा सन २०१०-११ या वित्तीय वर्षाचा जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरुपातील **दुस-या हप्त्याचा** रु. २४९,८०,००,०००/- (रुपये दोनशे एकोणपन्नास कोटी ऐंशी लाख फक्त) इतका निधी सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे सर्व जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात येत आहे. सदर अनुदान सोबतच्या प्रपत्रामध्ये नमूद केलेल्या जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बी.डी.एस.) वितरीत करण्यात येत आहे.

२. इ-पंचायत या प्रकल्पांतर्गत केंद्र सरकारच्या पंचायती राज मंत्रालयाने एन.आय.सी. द्वारा पंचायत राज संस्थांसाठी १२ प्रकारच्या संगणकीय आज्ञावलींची निर्मिती केली असून, त्यापैकी राज्यात पंचायत राज संस्थांचे लेखे ठेवण्यासाठी विकसीत केलेल्या वेब वेस्ड स्वरुपाच्या प्रिया सॉप्ट व प्लॅन प्लस या संगणकीय आज्ञावलीच्या अंमलबजावणीस यापूर्वीच प्रारंभ झाला आहे. पंचायत राज संस्थांना भविष्य काळात देण्यात येणा-या व सध्या अंमलबजावणी होत असलेल्या सॉप्टवेअर्सची सुरळीत अंमलबजावणी होण्यासाठी राज्यातील सर्व ग्रामपंचायतींचे लवकरात लवकर संगणकीकरण करणे आवश्यक आहे. त्यानुसार राज्यातील सर्व ग्रामपंचायतींना विविध सॉप्टवेअर्सची अंमलबजावणी होईल, अशा उच्च क्षमतेचे संगणक, प्रिंटर कम स्कॅनर , ई-स्वाक्षरीचे मोड्यूल, इंटरनेट जोडणी, यू.पी.एस., नेटवर्क प्रिंटर या स्वरुपाच्या सुविधा देण्यात येणार आहेत. त्यानुसार राज्यातील पंचायत राज संस्थांना खालील प्रमाणे सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत.

| पंचायत राज संस्था | संगणक (संख्या) | प्रिंटर कम स्कॅनर (संख्या) | ई-स्वाक्षरी मोड्यूल (संख्या) | यू.पी.एस. (संख्या) | नेटवर्क प्रिंटर (संख्या) |
|---|---|---|---|---|---|
| जि.प स्तरासाठी | ५ | १ | ४ | ५ | १ |
| प्रत्येक पं.स.साठी | १ | १ | ४ | १ | १ |
| प्रत्येक ग्रा.पं. साठी | १ | १ | १ | १ | - |

३. केंद्र शासनाच्या पंचायत राज मंत्रालयाने दिनांक १४/२/२०११ च्या पत्रान्वये सदर बाबीसाठी लागणारा आवश्यक निधी १३ व्या वित्त आयोगाच्या या हप्त्यातून उपलब्ध करून देण्याबाबत राज्याला सूचित केले आहे. त्यानुसार

या हप्त्यातून संगणक, प्रिंटर कम स्कॅनर , ई-स्वाक्षरीचे मोड्यूल, इंटरनेट जोडणी,यू.पी.एस. या बाबींसाठी आवश्यक असणारा निधी उपलब्ध करुन देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

४. त्यानुसार आपल्या जिल्ह्यातील जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरासाठी परिच्छेद क्र-२ मधील तक्त्यानुसार इ-पंचायत प्रकल्पांतर्गत आवश्यक असलेल्या हार्डवेअरच्या एकूण संख्येनुसार इ-पंचायत प्रकल्पांतर्गत पुरविण्यात येणा-या वरील बाबींसाठी आवश्यक असलेली रक्कम या वितरण आदेशान्वये वितरीत होणा-या निधीतून आपल्या स्तरावर बाजूला ठेऊन त्या रकमेची अदायगी संबंधित पुरवठादारास मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा स्तरावरून करावी. यासाठी शासनाच्या दरकरारावर उपलब्ध असलेल्या पुरवठादाराकडून वरील बाबींची खरेदी करावयाची आहे.याबाबत राज्यस्तरावर निर्णय घेण्याची प्रकिया सुरु असून त्यासंदर्भात धोरण निश्चित झाल्यानंतर त्याबाबतचे परिपत्रक स्वतंत्रपणे लवकरच निर्गमित करण्यात येईल.

५. त्याचप्रमाणे संगणक व अनुषंगीक बाबींसाठी आवश्यक रक्कम बाजूला काढून झाल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी उर्वरीत रकमेचे जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरासाठी १०:२०:७० या प्रमाणात विभाजन करावे व जिल्हा परिषद स्तराचा १० टक्के निधी वगळून पंचायत समित्या व ग्रामपंचायत स्तरासाठीचा निधी संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयात पंचायत समित्यांना निधी वितरण करण्यासाठी नमूद केलेल्या विहीत निकषानुसार वितरीत करावा. तथापि, जिल्हा परिषद स्तरावरून ग्रामपंचायतींना निधी वितरण करण्यासाठी संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील **ब**(IV) मध्ये दिलेल्या विहीत निकषात **खालील अ व ब नुसार** बदल करून ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन (Calculation) करावे.

(अ) ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करताना निकष क्रमांक-५ (प्लॅन प्लस सॉफ्टवेअरचा वापर) चे ५ टक्के प्रमाण पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी असलेल्या १५ टक्के प्रमाणात समाविष्ट करुन ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे,

(ब) निकष क्रमांक-८ ( ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) ) चे ५ टक्के प्रमाण भारताचे नियंत्रक व महालेखा परीक्षक यांनी ठरवून दिलेल्या सुधारित नमुन्यात लेखे ठेवण्याच्या ( प्रिया सॉप्टच्या) अंमलबजावणीसाठी असलेल्या १० टक्के प्रमाणात समाविष्ट करुन त्यानुसार ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे, असे सर्व संबंधितांस कळविण्यात यावे.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वितरीत करावयाच्या निधीचे उपरोक्त सूचनांनुसार प्रगणन केल्यानंतर पंचायत समिती व ग्रामपंचायतींना देय असणारा निधी ५ ते १० दिवसाचे आत इ.सी.एस. (Electronic Clearance System)./एन.इ.एफ.टी (National Electronic Fund Transfer) किंवा आर.टी.जी.एस (Real Time Gross Settlement) यापैकी उपलब्ध असलेल्या बॅकिंग सिस्टीमद्वारे, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी सदर पंचायत समित्या व ग्राम पंचायतींच्या खात्यावर वर्ग करावा. निधी वर्ग करण्यास ५ ते १० दिवसांपेक्षा जास्त विलंब झाल्यास त्या विलंबाबाबत भारतीय रिझर्व बँकेच्या दराने आपणास व्याज द्यावे लागेल, याची आपण नोंद घ्यावी.

७. **या वितरण आदेशानुसार प्राप्त निधीचा विनियोग निधी वितरीत झाल्यापासून सहा महिन्याच्या आत करावयाचा आहे. तसेच आदेश क्रमांक -तेविआ २०१०/प्र.क्र.४३/वित्त-४ दिनांक ३०/८/२०१० च्या वितरण आदेशान्वये जनरल बेसिक ग्रॅंटच्या स्वरूपात प्राप्त झालेल्या निधीतील अखर्चित रक्कमेचा विनियोगही पुढील सहा महिन्याच्या आत करण्यासाठी परवानगी देण्यात येत आहे.** निधी विहित वेळेत खर्च करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच संबंधित गट विकास अधिकारी, पंचायत समिती व ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी, ग्रामपंचायत यांची राहील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी पंचायत राज संस्थांच्या तीनही स्तरावर झालेल्या खर्चाचा आढावा प्रत्येक महिन्यात घ्यावा व हा निधी शासनाने मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी व विहित वेळेत खर्च करावा यादृष्टीने योग्य अशा उपाययोजना कराव्यात. **निधी खर्च करताना संदर्भ क्र-१ च्या शासन निर्णयात व या शासन निर्णयात दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करुन निधी खर्च करावा.** निधी

विहित वेळेत खर्च न झाल्यास त्याची सर्व जबाबदारी अंतिमतः मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील व त्याची नोंद त्यांच्या गोपनीय अहवालात घेण्यात येईल.

८. सदर निधी सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्यात येत असून हा निधी खर्च करण्यास शासनातर्फे मान्यता देण्यात येत आहे. या निधीतून बाबनिहाय झालेल्या खर्चाची माहिती, संदर्भ क्र.२ नुसार दिलेल्या विहित विवरणपत्रानुसार पुढील प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता आपल्या विभागाच्या उपायुक्त (विकास) यांचे कार्यालयास व शासनास सादर करावी. तसेच, निधीच्या खर्चाचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र व आर्थिक/ भौतिक अहवालही त्यासोबत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात यावा.

९. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ - जिल्हा परिषद/जिल्हा स्तरीय पंचायतीस सहाय्य, ३१ - सहाय्यक अनुदाने, (००) (०१) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ १५२३) या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

१०. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारिक संदर्भ क्र.३२३/११/अर्थ-१७, दिनांक २५/३/२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०११०३२५१२०२१९००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त.(महसूल)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक , स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग का.क्र.(व्यय-१५/अर्थोपाय /वित्त आयोग कक्ष/अर्थसंकल्प-१७)
कक्ष अधिकारी, कार्यासन क्र. वित्त-१/वित्त-७/वित्त-८, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

जनरल बेसिक ग्रॅंट वितरण आदेश क्रमांक:३
शासन निर्णय क्रमांक तेविआ २०१०/ प्र.क्र.२९/वित्त-४,
दिनांक- २५ मार्च,२०११ चे प्रपत्र.

(रु. हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | एकूण |
|---|---|---|
| १ | ठाणे | ८७२५१ |
| २ | रायगड | ६५२९५ |
| ३ | रत्नागिरी | ६३०५३ |
| ४ | सिंधुदुर्ग | ४२४०१ |
| ५ | नाशिक | ११८२१३ |
| ६ | धुळे | ६८७८६ |
| ७ | नंदूरबार | ७४३५० |
| ८ | जळगाव | १००५३५ |
| ९ | अहमदनगर | १२०९८९ |
| १० | पुणे | १०४६०१ |
| ११ | सातारा | ८७४५७ |
| १२ | सांगली | ७५७९२ |
| १३ | सोलापूर | १०२७८५ |
| १४ | कोल्हापूर | ८४४१५ |
| १५ | औरंगाबाद | ७५९५५ |
| १६ | जालना | ६३५६७ |
| १७ | परभणी | ५४१२६ |
| १८ | हिंगोली | ४९७८५ |
| १९ | बीड | ७८५०८ |
| २० | नांदेड | ९३१५१ |
| २१ | उस्मानाबाद | ६३५३२ |
| २२ | लातूर | ७१६८१ |
| २३ | बुलढाणा | ७८२४२ |
| २४ | अकोला | ५४१२८ |
| २५ | वाशिम | ५२२०५ |
| २६ | अमरावती | ८६५५२ |
| २७ | यवतमाळ | ९३५४५ |
| २८ | वर्धा | ५४२१२ |
| २९ | नागपूर | ६९७९३ |
| ३० | भंडारा | ५१५८१ |
| ३१ | गोंदिया | ५७९९५ |
| ३२ | चंद्रपूर | ७५४३७ |
| ३३ | गडचिरोली | ७८०८२ |
| | एकूण | २४९८००० |

( प्रतिभा मा. पाटील )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.